# जानुज़ कोर्चाक

## मुलांचे सम्राट



डेविड, चित्र : बिल, मराठी : अश्विनी बर्वे

### मुलांचा सम्राट

जानुज़ कोर्चाक एक लेखक, रेडिओ कलाकार, शिक्षक आणि मुलांचे डॉक्टर होते. पण या सगळ्याच्या पलीकडे ते जगातले महान हिरो होते. ते वॉरसॉ, पोलंड येथील यहूदी अनाथालयाचे सर्वप्रिय निदर्शक होते. जेव्हा जर्मनीत हिटलर आणि नाझी पार्टीचा उदय होत होता, तेव्हा कोचार्क शेकडो अनाथ मुलांचे प्रेमाने संगोपन करत होते. मुलं त्यांना आपले वडील समजत होते आणि प्रेमाने त्यांना “म्हातारा डॉक्टर” म्हणत.

कोर्चाक आपल्या अनाथालयातल्या मुलांना वाचवू शकले नाही. पण युद्धाच्या त्या अंधाऱ्या काळात त्यांनी मुलांना बऱ्याच काळ सुरक्षित ठेवले.शेवटी हिटलरचे सैनिक त्या अनाथ मुलांना ट्रेब्लिन्का गॅस चेंबर मध्ये घेवून गेले. कोचार्क शेवटपर्यंत मुलांबरोबर राहिले. जानुज कोचार्क यांचे जीवन, हिटलरच्या क्रूरतेने भरलेले वेदनादायी कहाणी आहे. ही कहाणी मानवाला जबरदस्त हिंमत देते.

१८७८ हे ते साल होते, युरोपमधल्या लोकांना खूप आशा होत्या. रोम मध्ये एका नवीन पोपची निवड झाली होती. एका नव्या राजाला मुकुटपण घातला गेला होता..

त्यावर्षी पारीस मध्ये एक आंतरराष्ट्रीय प्रदर्शन भरवले गेले होते. त्याकाळातली सगळ्यात मोठं प्रदर्शन होते ते. तिथे लोक हजारो नवीन गोष्टी बघू शकत होते. त्यात एक "स्टेचू ऑफ़ लिबर्टी" ची मूर्ती होती. जी मानवाचं स्वातंत्र्य आणि ज्ञानाचे प्रतिक होती. प्रदर्शन संपल्यावर "स्टेचू ऑफ़ लिबर्टी" ची मूर्ती अमेरिकेला पाठवली गेली. फ्रेंच लोकांनी अमेरिकेला ती भेट दिली होती.

१८७८ मध्ये पुढे येणाऱ्या संकटाचे संकेत होते. तेव्हा मे, तेव्हा जर्मनीत गोथा येथे युरोपचे पहिले स्मशान निर्माण झाले. ज्यात मृत लोकांवर अंतिम संस्कार केले जात.







जानुज़ कोर्चाक यांचा जन्म १८७८ मध्ये पोलंडमधिल वॉरसॉ येथे झाला. नंतर ते पोलंडचे सर्वश्रेठ नागरिक झाले. यूरोपच्या सर्वात दुःखद काळात त्यांनी एका महान हिरोची भूमिका निभावली.

कोर्चाक लहान असतांना वॉरसॉ, एक सुंदर शहर होते. वॉरसॉ, विस्तुला नदीच्या किनाऱ्यावर वसले होते. शहरातील रस्त्यांवर छोटे-छोटे दगड पसरले होते. आणि दोन्ही बाजूला ओकची झाडे होती. तिथे एक सार्वजनिक पार्क, महाल आणि एक शाही किल्लापण होता.

कोर्चाकचे आई-वडील जोसेफ और सेसिलिया गोल्डस्मिथ. त्यांचे वडील एक यशस्वी वकील होते आणि आई एक प्रभावशाली व्यापाऱ्याची मुलगी होती.ते यहुदी नक्की होते. पण धार्मिक नव्हते. त्यांनी आपल्या मुलाचे नाव त्याच्या आजोबांच्या वरून ठेवले होते. यहुदी उच्चार असलेले नाव हिर्षच्या ऐवजी त्यांनी मुलाचे नाव हेनरिक ठेवले.त्यांचे नाव जानुज कोचार्क हे खूप नंतर पडले.



लहानपणी हेनरिक गोल्डस्मिथ खूप शांत होते. ते लाकडाच्या फटकुरा बरोबर तासंतास खेळत असत आणि आपल्या विचारांमध्ये हरवून जात. तो स्वतः "पऱ्यांच्या गोष्टी" ऐकवत असे. नंतर जेव्हा हेनरिकला पुस्तकांचा शोध लागला, तेव्हा तो दिवसभर पुस्तके वाचत राहत असे.

हेनरिकचे मोजून काही मित्र होते. ते नेहमी जवळच्या साक्सी बागेत खेळायला जात असत.त्याबद्दल त्यांनी नंतर लिहले, "तिथे मी लोकांशी खूप गप्पा मारत असे. आपल्या बरोबरच्या मुलांशी आणि काही मोठ्या लोकांशीपण. माझे काही खूप वृद्ध मित्र होते. ते माझे प्रशंसक होते. काहीजण मला दार्शनिक म्हणत."

मग अचानक १८८९ मध्ये, हेनरिकचे शांत जीवन नेहमीसाठी बदलले. त्याच्या वडिलांना मानसिक विकार झाला आणि १८९६ मध्ये त्यांचा मृत्यू झाला. त्यावेळी ते फक्त ५२ वर्षाचे होते. हेनरिकला वडिलांच्या मृत्यूचे खूप दुःख झाले. त्याला वाटले की, एक दिवस तो आपल्या वडीलांसारखाच वेडा होईल.

जोसफ गोल्डस्मिथच्या मृत्यू नंतर कुटुंबाची आर्थिक परिस्थिती खूप कमजोर झाली. त्यांनी घरातले महागडे फर्निचर, सुंदर पेंटिंग्ज, आणि मूल्यवान भांडी विकून टाकले. हेनरिक शाळेत काम करत असे. तो मुलांच्या शिकवण्या घेत असे. खर्च भागवावा म्हणून त्याच्या आईने काही भाडेकरूपण ठेवले होते.

त्यावेळी हेनरिकने उदास आणि दुःखी कथा आणि कविता लिहायला सुरुवात केली होती.

“मला मरू द्या,” त्याने लिहले. “मला माझी निराशा कब्रस्तान मध्ये सोडून येवू द्या.”

तेव्हाच त्याने एक नाटक लिहले. नाटक एक वेडा माणूस आणि त्याचे कुटुंब यावर होते. ते नाटक त्याने एका स्पर्धेत पाठवले. ते नाटक त्याने जानुज कोचार्क या नावाने लिहले. ज्यामुळे परीक्षकांना तो यहुदी आहे हे कळले.





कोर्चाक यांनी वॉरसॉ विद्यापीठात वैद्यकीय शिक्षण घेतले. डॉक्टर झाल्यावर त्यांनी मुलांच्या दवाखान्यात काम केले. “मला मुलांबरोबर सगळ्यात छान वाटते,” ते म्हणत.

कोर्चाक यांनी मुलांसाठी गोष्टी लिहल्या आणि पालकांसाठी सल्लामसलतीची पुस्तके लिहिली. त्यांनी पालकांना आणि मोठ्यांना समजावलं की त्यांनी मुलांच्या भावनांचा आदर सन्मान केला पाहिजे. आणि सगळ्यात महत्वाची गोष्ट – मोठ्यांनी मुलांवर अथक प्रेम करायला हवे.

जानुज़ कोर्चाक यहूदी मुलासाठी असलेल्या नव्या अनाथालयाचे निर्देशक झाले. ते मुलांना मिठाईच्या गोळ्या वाटत असत. त्यांना गोष्टी आणि किस्से सांगत आणि जादूच्या गोष्टीसुद्धा दाखवत. ते मुलांना तेलकट खडू देवून स्वतःच्या टकलावर चित्र काढायला सांगत. कोचार्क मुलांना त्यांचा गृहपाठ करण्यासाठी मदत करत आणि त्यांच्याबरोबर खेळ खेळत.

मुलं त्यांच्यावर खूप प्रेम करत.

जेव्हा कोर्चार्क बाहेर बसत तेव्हा छोटी मुलं त्यांच्या खांद्यावर चढत आणि त्यांच्या दाढीशी खेळत. अनेकवेळा मुलं त्यांच्या कुशीतच झोपून जात.कोचार्क फक्त हसत. “मी एक जुन्या झाडासारखा असून ही मुलं म्हणजे माझ्या फांद्यावरील चिमण्या आहेत.”

त्या अनाथलयात कोचार्क मुलांचे डॉक्टर, न्हावी, वडील सगळे काही होते. कोचार्क मुलांचे नखं आणि केस कापत.त्यांच्या बुटांची काळजी घेत. जेव्हा एखाद्या मुलाचा दात पडे तेव्हा ते त्या मुलाला ‘बक्षीस’ देत. मग त्यांनी मुलांच्या पडलेल्या दातांपासून एक किल्ला बनवला.

संध्याकाळी कोचार्क आणि त्यांची सहायिका स्तेफनिया विल्जका प्रत्येक मुलाच्या पलंगाजवळ जात, ते मुलांशी बोलत, त्यांच्यावर पांघरून घालत आणि त्यांना शुभरात्र म्हणत.





१९३० मध्ये रेडीओ नवीन होता आणि लोकांना तो ऐकायला फार मजा येत असे. कोचार्क रेडीओवर नियमित प्रत्येक आठवड्याला कथा आणि सल्लामसलतीचा कार्यक्रम सादर करत.

लवकरच पोलंड मध्ये त्यांचा रेडीओ कार्यक्रम खूप प्रसिद्ध झाला. कोचार्क यांना त्यांचा कार्यक्रम यशस्वी झाला म्हणून पोलिश अकादमी ऑफ लिटरेचरने "गोल्डन लौरेल" अवार्ड देवून सम्मानित केले. पोलिश रिपब्लिकने राष्ट्र निर्माणासाठी त्यांना "सिल्वर क्रॉस" हा पुरस्कार देवून नावाजले.

१९३० मध्ये पूर्ण युरोप मध्ये काळे ढग पसरले होते. १९३३ मध्ये, वॉरसॉ पासून ३५० मैल दूर बर्लिन मध्ये एक यहूदी-विरोधी पार्टी जर्मनी सांभाळत होती. त्यानंतर यहुदीची पुस्तके खुलेआम जाळली गेली आणि त्यांची संपत्ती लुटली गेली..

१९३८ मध्ये जर्मन फौज ऑस्ट्रिया मध्ये घुसली. १ सप्टेंबर १९३९ रोजी जर्मन फौजेने पोलंडवर आक्रमण केले. यात वॉरसॉ शहराबरोबरच पोलंड मधले इतर शहरेही सामील होती. काही दिवस तर असेही जात की, दिवसभर गोळीबार चालू असे. आणि न थांबता बॉम्ब पडत असत. सप्टेंबर संपेपर्यत पोलंड हरला होता.

जर्मन फौजेने पोलंडवर कब्जा केल्यानंतर नाझी पोलंडमध्ये घुसले. त्यांनी रस्त्यावर यहुदीवर आक्रमण केले. त्यांचे व्यवसाय, संपत्ती लुटली. आणि मग यहुदींना मेहनत करण्यासाठी मजुरांच्या तळात पाठवले. त्यांनी बळजबरीने प्रत्येक यहुदीना आपल्या हातात “डेविडचा तारा“ घालायला बंधनकारक केले.

जानुज़ कोर्चाक म्हणाले, “मी असे वाचन देतो की मी कधीच “डेविडच्या ताऱ्याचे” प्रतिक घालणार नाही.





१९४० मध्ये नाझींनी आदेशाचे पालन न करण्याच्या आरोपाखाली जानुज कोचार्क यांना अटक केली. एक महिनानंतर त्यांना सोडून दिले. त्यानंतर एक वर्षाने त्यांना परत अटक केली. यावेळी एका मित्राने मदत केली आणि त्यांना सोडवले.

एप्रिल १९४० पासून वॉरसॉमध्ये आठ-फुट उंचीची एक भिंत बांधली गेली आणि त्यावर काटेरी तारा लावल्या गेल्या. त्या तळाच्या आत ७३ रस्ते होते. त्या तळावर चार लाख पेक्षाही अधिक यहुदी नाईलाजाने राहत होते. यात कोचार्क आणि त्यांच्या अनाथालयातील मुले यांचा सुद्धा समावेश होता. या तळाला "वॉरसॉ तळ" असे नाव दिले होते.




कोर्चार्क “वॉरसॉ तळा” वर आपल्या मुलांना घेवून जाऊ इच्छित नव्हते.त्यांना वाटत होते की, छोटी मुले त्यामुळे खूप घाबरतील, म्हणून ते मुलांना तिथे एक परेड करून घेवून गेले. सगळ्यात आधी कोचार्क होते आणि त्यांच्या बरोबर एक मुलगा होता, ज्याने “किंग मैट“ चा झेंडा हातात घेतला होता. कोचार्क यांच्या पुस्तकात लहान-राजाचे पात्र होते, आणि तो मुलांचा हिरो होता. मुलांनी गाणं म्हणत तळावर आपल्या नव्या घरात प्रवेश केला.

१९४१ मध्ये नाझींनी तळाचा आकार कमी केला. त्यामुळे मुलांना परत घर बदलावे लागले.

जानेवारी १९४० मध्ये, कोचार्क यांनी आपल्या डायरी लिहिली पण त्यात त्यांनी खूप कमी लिहले. मग मे १९४२ नंतर त्यांनी परत नियमित डायरी लिहायला सुरुवात केली. त्यांनी तळाचा उल्लेख “प्लेगग्रस्त इलाखा...वेड्यांचे घर,” असा केला. त्यांनी तळाला “तुरुंग “म्हटले.



तळाचे क्षेत्रफळ कमी झाल्यामुळे प्रत्येक घरात अनेक कुटुंबाना एकत्र राहणे भाग पडले. तिथे खाणं, कोळसे, लाकडं यांची नेहमीच टंचाई होती. औषधेपण खूप कमी मिळत. हजारो लोक रस्त्यावर भीक मागत. लोकांजवळ जे काही सामान होते, ते घेवून ते रस्त्यावर उभे राहत आणि पोळीच्या बदल्यात ते सामान देवून टाकत. तळावर प्रत्येक महिन्याला भुकेने आणि आजाराने हजारो माणसं मरत होती.

कोर्चार्क यांनी लिहले, “माझी मुले आता मोठ्या अनिश्चिततेमध्ये आणि भीतीमध्ये जगत आहेत.”

१२ जुलै १९४२ला सगळीकडे असे पोस्टर लागले होते की, तळ आता लवकरच रिकामे केले जाणार आहे. सगळ्या यहुदींना काम करण्यासाठी पूर्वेला घेवून जाणार आहे. पण लोकांना त्यामागचा खोटेपणा चांगलाच माहित होता. यहुदींना गासच्या भट्टीमध्ये घेवून जावून मारून टाकले जाईल. त्यांचे उरलेसुरले अवशेष आगीच्या हवाली करून नष्ट केले जातील. ४ ऑगस्टला कोचार्क यांनी आपल्या डायरीत लिहले, “सकाळी सकाळी ५.३० वाजता ढग आले होते. वाटतं आज दिवस सामान्य असेल.” त्यांनी आपल्या मुलांच्या हास्याबद्दल लिहले, “त्यांचे हास्य कोमेजले आहे, ती आजारी आहेत, त्यांची फुफ्पुसे अशक्त आहेत.”

दोन दिवसांनी ६ ऑगस्टला नाझी कोचार्क यांच्या मुलांना अटक करायला आले.

कोर्चार्क यांना तयारी साठी फक्त १५ मिनिटे दिली. कोचार्क यांनी मुलांना सांगितले की त्यांना काळजी करण्याची किंवा घाबरण्याची काही गरज नाही. “काहीही होवू द्या, मी तुमच्याबरोबर नेहमीच असणार आहे,” कोचार्क म्हणाले. कोचार्क यांनी मुलांना त्यांची कोणतीही प्रिय एक वस्तू बरोबर न्यायला सांगितली. ती वस्तू म्हणजे एखादे खेळणे किंवा त्यांच्या आवडीचे पुस्तक होवू शकत होते. मग मुले दोन-दोन च्या रांगा करून उभे राहिले.ते आपल्या प्रिय “म्हाताऱ्या डॉक्टर” च्या मागे चालू लागले. सगळ्यात पुढे चालणार्या मुलाच्या हातात “किंग मैट” चा झेंडा होता.

कोर्चार्क, त्याचे सहायक आणि १९२ मुले, समोर, सरळ बघत चालत गेले. चालता-चालता त्यांनी लेफ्ट-राईटचे गाणं म्हटलं. अशा प्रकारे त्यांनी दोन मैल, स्टेशनपर्यंतचा प्रवास केला. रस्त्यात ते एका यहुदी कब्रस्तानच्या समोरून गेले. तिथे मृतदेहांच्या राशी पडल्या होत्या. ज्यांचे दफन करणे बाकी होते. मुलं कोचार्कच्या मागे-मागे जात होते.






असा एक रिपोर्ट आहे की, शेवटच्या क्षणी एका नाझी कमांडरने जानुज कोचार्कला ओळखले आणि त्यांना सोडण्यास तो तयार झाला. पण जानुज कोचार्क याला बिलकुल तयार झाले नाही. सगळ्यात दुःखाच्या वेळी ते आपल्या मुलांना एकटं कसे सोडू शकणार होते?

लोक रडले, ओरडले, आणि त्यांनी विनवणी केली की त्यांना रेल्वेत बळजबरीने चढवू नका. पण जानुज कोचार्क यांनी आपल्या मुलांना रेल्वेत चढण्यास मदत केली.



त्यांची रेल्वे ६०-मैल दूर, उत्तर-पूर्व दिशेला नेली गेली. त्या शेवटच्या स्थानकाचे नाव होते दिशा में ले गई. ट्रेब्लिन्का. त्या स्थानकावर रेस्टॉरंट, हॉटेल, बेकरीचे खोटे बोर्ड लागलेले होते. स्टेशनवर इतर शहरात जाण्यासाठीच्या खुणा होत्या. पण यहुदीसाठी ट्रेब्लिन्का स्टेशनच त्यांचा शेवटचा मुक्काम होता. तिथून ते अजून कुठे जाऊ शकत नव्हते.

तिथे जानुज कोचार्क यांचा त्यांच्या अनाथ मुलांबरोबर मृत्यू झाला.

जानुज़ कोर्चार्क यांच्या शेवटच्या डायरीत लिहले आहे, “मी कोणाच्याच बाबत वाईट विचार करू शकत नाही. मी वाईट काम करू शकत नाही. मला माहित नाही लोक वाईट कसे करतात.”

## लेखकाची नोंद

तसे तर अधिक ठिकाणी जानुज कोचार्कचे जन्मसाल १८७८ सांगितले गेले आहे. पण त्याबाबतीत निश्चित काही सांगता येत नाही. १९४२ मध्ये जानुज कोचार्कने आपल्या डायरीत लिहलं आहे. "उद्या मी ६३ किंवा ६४ वर्षाचा होईल. किती वर्षांपर्यंत वडिलांना माझा जन्मदाखला करू शकले नाही. त्यामुळे मला कधी कधी त्रास सोसावा लागला."

जेव्हा कोचार्क छोटे होते तेव्हा गपचूप खेळत असतांना त्यांची आई त्यांना बघत असे. आईच्या नुसार कोचार्कला कोणती महत्वाकांक्षा नव्हती. कोचार्कचे वडील त्यांना "मूर्ख" समजत. पण कोचार्कची आजी त्यांना एक "छोटा दार्शनिक "समजत होती.

कोचार्क यांनी तीन युद्धांमध्ये डॉक्टर म्हणून फौज मध्ये काम केले. रशिया-जपान युद्ध, पहिले महायुद्ध आणि पोलिश सोवियत युद्ध.

कोर्चार्क यांनी "म्हातारा डॉक्टर "हे नाव आपल्या रेडीओच्या कार्यक्रमात पहिल्यांदा वापरलं. कारण? रेडीओ स्टेशनचे अधिकारी आपल्या सामान्य श्रोत्यांना हे सांगू इच्छित नव्हते की, ते एका यहुदी डॉक्टर कडून सल्ला ऐकत आहेत.

